**सार्वजनिक बांधकाम विभागातर्गंत कंत्राटदार यांच्या विविध मागण्यासंदर्भात नवीन सुधारीत सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीएटी-२०२२/प्र.क्र.५०/इमा.२**
मादाम कामा रोड, हूतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ११/०५/२०२२

वाचा :- १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.सीएटी-२०१७/प्र.क्र.८/इमा-२, दि.२७/९/२०१८
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.सीएटी २०१९/प्र.क्र.१२०/इमा-२, दि.१७/९/२०१९
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.९५/इमा-२, दि.१६/११/२०२१
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र. १२७/इमा-२, दि.२८/११/२०१८

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भिय विविध शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागातील निविदा पध्दतीबाबत वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. मार्च २०२० पासून कोविड महामारीमूळे कामांची उपलब्धता, प्रगती व निधीबाबत कंत्राटदारांना अडचणी सोसाव्या लागल्याने विविध कंत्राटदार संघटनांनी निविदा पध्दतीमध्ये काही सूधारणा होणेबाबत मागणी केली आहे. सदर मागण्यांवर संबधित संघटनांशी वेळोवेळी चर्चा करुन खालील सुधारीत आदेश देण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

१) शासन निर्णय दि.२७/०९/२०१८ अन्वये परिच्छेद ५.५ मधील तरतूदीनुसार रु.१.५० कोटी रक्कमेच्या कामांसाठी तसेच सुशिक्षित बेरोजगार अभियंता यांच्या कामांसाठी Hot Mix Plant/Batch Mix Plant/Machinery यांच्या मालकीबाबतची अट निविदेमध्ये समाविष्ठ न करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या होत्या. तथापि आता रु.५० लक्षपर्यंतच्या रस्ते डांबरीकरण, पूल व इमारती कामांसाठी स्व:मालकीची अट निविदेमध्ये घालण्यात येवू नये.

२) शासन निर्णय दि.२७/९/२०१८ अन्वये परिच्छेद क्र.२.९ मधील तरतूदीनूसार कंत्राटदाराची कमाल उलाढाल मागील ५ वर्षासाठी नमूद केली आहे. तथापि कोविड महामारीमूळे उद्भवलेली विशिष्ट परिस्थिती विचारात घेवून कंत्राटदाराची उलाढाल मागील ५ वर्षाऐवजी ७ वर्षे विचारात घेण्यात यावी. तसेच शासन निर्णय दि.२७/९/२०१८ मधील परिच्छेद २.९ मध्ये नमूद कंत्राटदाराने केलेले तुल्यबळ किंमतीचे काम, देय कामाचे महत्वाचे परिमाण व Bid Capacity यासाठी ५ वर्षाऐवजी ७ वर्षे कालावधी विचारात घेण्यात यावा. सदर सवलत केवळ मार्च २०२३ अखेर लागू राहील.

३) शासन परिपत्रक दि.१७/९/२०१९ अन्वये रु.३ लक्षपेक्षा जास्त किंमतीच्या सर्वच निविदामध्ये Bid Capacity ची अट समाविष्ट करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच Bid Capacity परिगणित करतांना {(अे X एन X २) - बी} ऐवजी {(अे X एन X १.५) - बी} प्रमाणे परिगणना करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. कोविड महामारीमूळे उद्भवलेली विशिष्ट परिस्थिती विचारात घेवून Bid Capacity परिगणित करतांना पूनश्चः {(अे X एन X २) - बी} याप्रमाणे Bid Capacity परिगणित करण्यात यावी.

४) शासन परिपत्रक दि.१७/९/२०१९ अन्वये रु.३ लक्षपेक्षा जास्त किंमतीच्या सर्वच निविदामध्ये Bid Capacity ची अट समाविष्ट करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि आता रु.३० लक्ष किंमतीच्या वरील सर्व कामांसाठी Bid Capacity ची अट लागू करावी. तथापि एकाच कंत्राटदाराने एका वित्तीय वर्षात तीन किंवा त्यापेक्षा जास्त कामे घेतली असल्यास त्याच्यासाठी त्या वित्तीय वर्षात पुढील निविदांसाठी बीड कॅपीसीटीची शर्त लागू राहील. या बाबत खातरजमा करण्यासाठी लिफाफा क्र.१ मध्ये चालू वित्तीय वर्षात हाती घेतलेल्या सर्व कामांची निविदा विषयक माहिती सादर करणे कंत्राटदारास बंधनकारक करावे.

५) शासन निर्णय दि.२८/११/२०१८ अन्वये रु.३ लक्ष आतील स्थानिक व रु.३ लक्ष वरील किंमतीच्या ई-निविदेसोबत जोडलेली सर्व कागदपत्रे खरी असल्याबाबतचे रु.५०० स्टॅम्प पेपरवर प्रतिज्ञापत्र लिफाफा क्र.१ मध्ये जोडणे कंत्राटदारास बंधनकारक करण्यात आले आहे. आता यामध्ये सुधारणा करुन रु.५०० ऐवजी रु.१०० स्टॅम्प पेपरवर प्रतिज्ञापत्र सादर करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

६) सुशिक्षित बेरोजगार अभियंता यांना रु.३० लक्ष किंमतीपर्यंतच्या फर्निचर कामांसाठी फर्निचर व तत्सम कामांसाठी आवश्यक असणा-या नोंदणी प्रमाणपत्रातून सूट देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१११७२९३३०९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN MANIKRAO CHIVATE

Digitally signed by SACHIN MANIKRAO CHIVATE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=643026ceca9d6dc21fa6c4525f6fd9fbdfc59a9a42af9ca3066f28a4b58ad630, cn=SACHIN MANIKRAO CHIVATE
Date: 2022.05.11 17:31:24 +05'30'

**(सचिन चिवटे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री ( सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (सा.बां), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. सर्व मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
९. सर्व अधिक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम मंडळ
१०.प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मर्यादित मुंबई
११.महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२.महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४.कार्यासन इमारती-२ (निवडनस्ती)